**<u>महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान</u>**
**इस्लामपूर शहर भुयारी गटार प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नगरो-२०१५/प्र.क्र.२००/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०१७

<u>वाचा</u>:

१. शासन निर्णय क्रमांक नगरो-२०१३/ प्र.क्र. ५०/ नवि-३३, दिनांक २६ मार्च २०१३
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र. क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट,२०१४.
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६
४. दिनांक १९/०८/२०१५ रोजी झालेल्या महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाखालील प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त
५. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे पत्र क्र. नपप्रसं/नगरोत्थान/इस्लामपूर भूगयो/ सं. ७८६/का.१३ दि. ०१ डिसेंबर, २०१५ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना:</u>**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयाच्या तरतुदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

**०२.** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये इस्लामपूर शहरासाठी रस्ते विकास प्रकल्प मंजूर करून प्रथम हप्त्याचा निधी वितरीत करण्यात आला होता. तथापि दिनांक १९.८.२०१५ रोजी पार पडलेल्या बैठकीमध्ये इस्लामपूर नगरपरिषदेने इस्लामपूर शहरास मंजूर केलेल्या रस्ते विकास प्रकल्पाऐवजी इस्लामपूर शहराच्या भुयारी गटार प्रकल्पास मान्यता देण्याबाबत विनंती करण्यात आली होती. त्याअनुषंगाने इस्लामपूर नगरपरिषदेने केलेल्या विनंतीनुसार सदर प्रस्ताव राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता. या प्रस्तावास संचालक (तांत्रिक), मध्यवर्ती नियोजन संकल्पचित्र व संनियंत्रण कक्ष, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोपरी, ठाणे यांनी दिनांक २७.१०.२०१५ रोजीच्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने राज्यस्तरीय मान्यता समितीच्या दि. १९.०८.२०१५ रोजी पार पडलेल्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने व त्याअनुषंगाने शासनाकडून प्राप्त झालेल्या अंतिम मान्यतेच्या अनुषंगाने इस्लामपूर शहराच्या भुयारी गटार प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियाना अंतर्गत इस्लामपूर नगरपरिषदेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने इस्लामपूर शहरासाठी संदर्भाधीन क्रमांक १ अन्वये मंजूर करण्यात

आलेला रस्ते विकास प्रकल्प रद्द करून त्याऐवजी इस्लामपूर शहराच्या भुयारी गटार प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे काही अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे. इस्लामपूर शहर भुयारी गटार प्रकल्पातील उपांगाचे व त्यांच्या किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | उपांगाचे नाव | रक्कम रु. (सन २०१४-१५ दरसूचीनुसार) |
|---|---|---|
| 1 | **Sewage Collection System HDPE & RCC Pipe L-99190m** | 53,23,94,412.00 |
| 2 | **Sewage Pumping station No. 1** | |
| 2A | Civil Work | 27,63,518.00 |
| 2B | Mechanical & Electrical Works | 71,71,800.00 |
| 2C | Rising Main for PS-1 DIK9 Dia-300 mm L-50 m | 4,82,238.00 |
| 3 | **Sewage Pumping station No. 2** | |
| 3A | Civil Work | 28,11,473.00 |
| 3B | Mechanical & Electrical Works | 71,00,600.00 |
| 3C | Rising Main for PS-1 DIK9 Dia-250 mm L-50 m | 4,04,289.00 |
| 4 | **Sewage Pumping station No. 3** | |
| 4A | Civil Work | 5,97,054.00 |
| 4B | Mechanical & Electrical Works | 37,92,500.00 |
| 4C | Rising Main for PS-1 DIK9 Dia-100 mm L-540 m | 10,47,373.00 |
| 5 | **Sewage Pumping station No. 4** | |
| 5A | Civil Work | 6,07,448.00 |
| 5B | Mechanical & Electrical Works | 37,08,000.00 |
| 5C | Rising Main for PS-1 DIK9 Dia-100 mm L-1650 m | 27,34,041.00 |
| 6 | **Sewage Treatment Plant (STP1-7.5 mld)** | 6,94,13,281.00 |
| 7 | **Sewage Treatment Plant (STP2-4.5 mld)** | 5,19,23,481.00 |
| 8 | **Effluent reuse system** | 62,36,600.00 |
| | Add cess for labour welfare (1%) | 69,31,881.08 |
| | Add Contingencies (3%) | 2,07,95,643.24 |
| | **Cost of the Scheme** | **72,09,15,632.32** |
| तथापि राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाची मंजूर किंमत | | रु.६९.४२ कोटी |

०२. **इस्लामपूर नगरपरिषदेसाठी मंजूर भुयारी** गटार प्रकल्पाचा वित्तिय आकृतीबंध **वित्तीय आकृतिबंध खालीलप्रमाणे राहील.**

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ८५ %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १५ %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | इस्लामपूर शहर भुयारी गटार प्रकल्प (ब) वर्ग | रु. ६९.४२ कोटी | रु. ५९.००७ कोटी | रु. १०.४१३ कोटी |

०३. **संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयानुसार** इस्लामपूर शहराच्या भुयारी गटार **प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे :-**

**अ)** सदर प्रकल्पाची कार्यान्वयन नगरपरिषदेमार्फत करण्यात यावे. तथापि प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार म्हणून नेमणे व त्याकरिता ३ टक्के इतके शुल्क नगरपरिषद निधीतून प्रदान करणे बंधनकारक राहील.

**ब)** सदर नगरपरिषदेने राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने प्रकल्पास मंजुरी देताना विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

**क)** इस्लामपूर नगरपरिषदेसाठी वितरीत करावयाचे अनुज्ञेय अनुदान मंजूर प्रकल्प किंमतीच्या मर्यादेत राहील. इस्लामपूर नगरपरिषदेने केलेल्या ठरावानुसार सदर प्रकल्पाच्या चालू दरसूचीनुसार होणाऱ्या किंमतीनुसार येणारा जादा खर्च हा इस्लामपूर नगरपरिषदेमार्फत करण्यात येईल.

**ड)** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या सुधारित शासन निर्णयानुसार सुधारीत वित्तीय आकृतीबंध लागू करताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहिल. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

I) **बंधनकारक सुधारणा:-**

१. प्रकल्प मंजुरीच्या पहिल्या वर्षात महानगरपालिकेने त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

२. उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहिल.

५. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुर्नमुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधील ते पूर्ण करणे बंधनकारक राहिल.
६. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "नागरी घनकचरा व्यवस्थापन व हाताळणी अधिनियम २०००" च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.
७. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८० टक्के करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९० टक्के या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

II) <u>वैकल्पिक सुधारणा:-</u>

१. मलनिस्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुर्नप्रक्रिया व पुर्नवापर करण्यात यावी.
२. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्यजलसंचय करावे.
३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जल लेखापरिक्षण (वॉटर ऑडीट) करुन घ्यावे.जललेखापरिक्षण अहवालात नमूद त्रूटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रूटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

**आ) <u>निधी वितरणाची कार्यपद्धती</u>**

१. इस्लामपूर शहर रस्ते विकास प्रकल्पाच्या प्रथम हप्त्याच्या अनुदानापोटी इस्लामपूर नगरपरिषदेस वितरीत केलेले व अद्याप अखर्चित असलेले अनुदान व त्यावर जमा झालेल्या व्याजाची रक्कम समायोजित करून भुयारी गटार प्रकल्पासाठी पुढील हप्त्याच्या निधीची रक्कम योजनेच्या विहित कार्यपध्दतीनुसार वितरीत करण्यात येईल.
२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी यापुढे राज्य शासनाचा अनुज्ञेय हिस्सा तीन हप्त्यात वितरीत करण्यात येते. त्याअनुषंगाने इस्लामपूर शहर भुयारी गटार प्रकल्पाचे उर्वरीत अनुदान दोन टप्प्यामध्ये वितरीत करण्यात येईल.
३. सदर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता आदेश निर्गमित केल्यानंतर एक महिन्याच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व १०१ व्या दिवसापूर्वी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे बंधनकारक राहील. यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.
४. या अभियानांत मंजूर प्रकल्पास राज्यशासनाने संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस राज्यशासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्यशासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल त्याप्रमाणात

संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे अशा योजनेत स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.

५. राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाची रक्कम व त्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने जमा केलेली पहिल्या हप्त्याची स्वहिश्याची रक्कम अशा एकत्रित रकमेच्या ७० टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतरच राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

६. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करताना प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव द्यावा.

**फ) प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासकीय/निमशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, स्वनिधीतून करुन घेणे बंधनकारक राहिल.तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**ग) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी:-**

"महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयीकृत बँकांकडून" तसेच "हुडको" "(HUDCO), "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण"(एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल)व शासनमान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील. तथापि वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात येईल. महाभियानातंर्गत कर्ज घेण्याबाबतचा प्रस्ताव वरील बाबींची पूर्तता करून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "राज्य स्तरीय नोडल संस्थेमार्फत" शासनाकडे सादर करावा. शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहिल. तसेच या संदर्भात कर्ज घेण्याबाबतची कार्यवाही करण्यापूर्वी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या संस्थेचे पत मुल्यांकन (क्रेडीट रेटींग) करुन घेणे आवश्यक राहिल. पत मुल्यांकन (क्रेडीट रेटींग) करुन घेतल्यानंतरच शासनाच्या मान्यतेने कर्ज घेता येईल.

**ह) "महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांची देखभाल व दुरूस्ती:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्प पूर्णत्वास गेल्यानंतर सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य

संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

**ज)** राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

**ल)** संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन निर्णयातील तरतुदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१७१८४९१४६५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.03.17 19:12:09 +05'30'

**( पां.जो.जाधव )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा .मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
४. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
५. प्रधान सचिव,पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव,नगरविकास विभाग(२) यांचे स्वीय सहायक
७. व्यवस्थापकीय संचालक ,एम.यु.आय.डी.सी.एल ,मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक , नगरपरिषद प्रशासन संचालनालय , वरळी, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१०. विभागीय आयुक्त, पुणे
११. जिल्हाधिकारी, सांगली
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, सांगली
१३. मुख्याधिकारी, इस्लामपूर नगरपरिषद , जि.सांगली.
१४. निवडनस्ती, नवि-३३.